**माहितीचा अधिकार अधिनियम २००५ च्या कलम ४(१)(क) व (ख) च्या अंमलबजावणीबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्र.रामाआ २०१९/प्र.क्र.१८/सहा**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १६ फेब्रुवारी, २०२३

वाचा: १. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.केमाअ२०१३/१५६/प्र.क्र.३६०/सहा, दिनांक ९ मे, २०१४
२. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.संकीर्ण२०१५/प्र.क्र.(२५२/१५)/सहा, दिनांक २८ जानेवारी, २०१६
३. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.संकीर्ण२०१८/प्र.क्र.६६/सहा, दिनांक १३ एप्रिल, २०१८
४.शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.रामाआ२०१९/प्र.क्र.१८/सहा, दिनांक १२ फ़ेब्रुवारी,२०१९
५. राज्य मुख्य माहिती आयुक्त यांचे पत्र क्र.मुमाआ-२०२२/सं.क्र.१००२, दिनांक १० जानेवारी, २०२३

**शासन परिपत्रक:-**

१.१ माहितीचा अधिकार अधिनियम, २००५च्या कलम ४ च्या प्रभावी अंमलबजावणीबाबत राज्य शासनाने वेळोवेळी सर्व सार्वजनिक प्राधिकरणांना सूचना दिल्या आहेत.

१.२ शासन परिपत्रक, दिनांक ९.५.२०१४ अन्वये सर्व सार्वजनिक प्राधिकरणांनी कलम ४ च्या तरतुदीनुसार १७ बाबींवरील माहिती संकेतस्थळावर प्रसिध्द करावी, सहायक जन माहिती अधिकारी, जन माहिती अधिकारी व अपिलीय प्राधिकारी निर्देशित करावेत, संकेत स्थळावरील माहिती अद्ययावत करावी अशा आशयाच्या सूचना दिल्या आहेत.

१.३ मा. राज्य माहिती आयुक्त यांनी दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने, शासन परिपत्रक, दिनांक २८.१.२०१६ अन्वये, माहिती अधिकार अधिनियम, २००५ अन्वये अर्जदारांना माहिती उपलब्ध होण्याच्या दृष्टीने शासनातील सर्व विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रीय कार्यालयांनी दरवर्षी दिनांक १ जानेवारी व १ जुलै रोजी वर्षातून किमान दोन वेळा संकेतस्थळावरील (website) माहिती अद्ययावत करावी अशा सूचना दिल्या आहेत.

१.४ शासन परिपत्रक, दिनांक १३.४.२०१८ अन्वये खालील बाबी सर्व सार्वजनिक प्राधिकरणांच्या निदर्शनास आणल्या आहेत.

*सार्वजनिक प्राधिकरणांकडे मोठ्या प्रमाणात ज्या बाबींची माहिती, माहिती अधिकारांतर्गत मागितली जाते त्याबाबींची माहिती सार्वजनिक प्राधिकरणांनी स्वयंप्रेरणेने प्रसिध्द केल्यास माहिती अधिकार अर्जांचे प्रमाण कमी होईल. प्रथम अपीलीय प्राधिका-यांनी अर्जदाराचे समाधान करण्याचा प्रयत्न केल्यास व आपल्या आदेशाची पूर्तता करण्याबाबत आढावा घ्यावा जेणेकरुन आयोगाकडे होणा-या द्वितीय अपीलांची संख्या कमी होण्यास मदत होईल.*

१.५ शासन परिपत्रक, दिनांक १२.०२.२०१९ अन्वये माहिती अधिकार अर्जाची संख्या कमी होण्यासाठी सर्व सार्वजनिक प्राधिकरणांनी माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ मधील कलम ४ ची प्रभावी अंमलबजावणी करण्याबाबत सूचना देण्यात आल्या आहेत.

२. तथापि अद्यापही अनेक सार्वजनिक प्राधिकरणांमध्ये माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ मधील कलम ४ च्या तरतुदींचे काटेकोरपणे पालन होत नसल्याने व संकेतस्थळावरील माहिती अद्ययावत नसल्याने राज्य माहिती आयोगाकडे प्राप्त होणा-या द्वितीय अपील अर्जांची संख्या वाढत असल्याचे मा.राज्य मुख्य माहिती आयुक्त यांनी दिनांक १०.०१.२०२३ रोजीच्या पत्रान्वये कळविले आहे. मा. राज्य मुख्य माहिती आयुक्त यांनी दिनांक १०.०१.२०२३ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या सूचनेस अनुसरुन सर्व सार्वजनिक प्राधिकरणांना खालीलप्रमाणे सूचित करण्यात येत आहे:-

- सर्व सार्वजनिक प्राधिकरणांनी माहिती अधिकार अधिनियम,२००५ च्या कलम ४(१) (क) व (ख) नुसार अभिलेखांचे संगणकीकरण करावे.
- माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ मधील कलम ४(१)(ख) मध्ये दर्शविलेल्या १७ बाबींवरील माहिती सर्व सार्वजनिक प्राधिकरणांनी प्रसिध्द करावी व दरवर्षी ती प्रकाशने अद्ययावत करावी.
- दिनांक १ जानेवारी व १ जुलै असे वर्षातून किमान दोन वेळा संकेतस्थळावरील (website) सदर माहिती अद्ययावत केली जावी.
- माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ मधील कलम ४(१)(ख) मध्ये दर्शविलेल्या १७ बाबींव्यतीरीक्त ज्या बाबींची माहिती, माहिती अधिकारांतर्गत मोठ्या प्रमाणात मागितली जाते त्या बाबींची माहिती स्वयंप्रेरणेने प्रसिध्द करावी.

३. उपरोक्त बाबी सर्व मंत्रालयीन विभाग प्रमुखांनी त्यांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख, सार्वजनिक प्राधिकरणे व सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणून द्याव्यात व आवश्यक कार्यवाही करण्याबाबत त्यांना सुचित करावे.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०२१६१६३६४५९५०७ असा आहे. हे परिपत्रक डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shwetambari Pravin Khade

Digitally signed by Shwetambari Pravin Khade
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9d702814ac9e8ff679064b8a4828e61adaa1acd78f420928f8e5191c2576b1a1, pseudonym=490D09740F52BFAA922859817C45AC7FB24C2A8D, serialNumber=8E3CFF5145F3538CC2FD3C8534F86EEB0CA96EE4F337FAF9D77EF01A5CC23B6B, cn=Shwetambari Pravin Khade
Date: 2023.02.16 16:40:43 +05'30'

**(श्वेतांबरी खडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा.राज्य मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
५. सर्व राज्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र राज्य
६. सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
९. महासंचालक, यशदा, पुणे
१०. प्रबंधक, (मूळ शाखा / अपील शाखा), उच्च न्यायालय, मुंबई
११. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१३. प्रबंधक ,लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१४. सर्व विभागीय आयुक्त
१५. सर्व जिल्हाधिकारी
१६.निवडनस्ती कार्यासन-सहा.